महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या विद्यापीठास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात (२४१५ १०८६) या लेखाशिर्षांतर्गत ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता अनुदान वितरीत करणेबाबत..(राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम)

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : मफुवि १४२४/प्र.क्र.१५३/७अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २३ ऑगस्ट, २०२४.

**वाचा** :- १) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.

२) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.

३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-१५१९/प्र.क्र.६५ /६-अे,दि.२६.०६.२०२३.

४) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र.डॉबासाकोकृवि/लेखा-२/ ४२९/२०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता, वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ च्या परिपत्रकान्वये एप्रिल ते जुलै, २०२४ पर्यंतची मासिक विवरणपत्रे बीम्स प्रणालीवर प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर विभागास आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा निधी, वित्त विभागामार्फत वितरीत करण्याबाबत सूचना निर्गमित केल्या होत्या. तसेच, संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकान्वये सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाच्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२४ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० व ७० टक्केच्या मर्यादेत वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात, भारतीय कृषि अनुसंधान परिषद, नवी दिल्ली यांचेकडून महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत, सुरु असलेल्या ४५ प्रकल्पांकरीता (केंद्र शासन हिस्सा-७५ टक्के) (कार्यक्रम) साठी रु.१३२१.५२ लाख निधी केंद्रशासनाद्वारे राहुरी कृषि विद्यापीठास वितरीत करण्यात आलेला आहे. त्यानुसार, नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांनी उपरोक्त संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये मागणी क्र. डी-३, “२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण” या मुख्य लेखाशीर्षाखाली '०१ पीक संवर्धन', १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(१९) भारतीय कृषी अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेअंतर्गत सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) २४१५ १०८६ या लेखाशीर्षांतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून निधी वितरीत करण्याबाबत निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केलेला आहे. त्यानुषंगाने, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या कृषि विद्यापीठाला भारतीय कृषी अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेअंतर्गत

सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) २४१५ १०८६ या लेखाशीर्षातर्गत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता, मागणी क्र. डी-३, ०१, पीक संवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(१९) भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेंतर्गत महात्मा फुले कृषि विद्यापीठास सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२४१५ १०८६) ३१- सहायक अनुदान (वेतनेतर) या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीपैकी रु.३००.०० लाख (अक्षरी रुपये तीन कोटी फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील खालीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव/लेखाशिर्ष | सन २०२४-२५ करीता अर्थसंकल्पीत निधी | विद्यापीठास वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|
| १ | २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१-पीकसंवर्धन, १२०- इतर संस्थांना सहाय्य, (००) (१९) भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेंतर्गत महात्मा फुले कृषि विद्यापीठास सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) २४१५ १०८६, ३१- सहायक अनुदान (वेतनेतर) | ११००.०० | ३००.०० |
| **एकूण** | | **११००.००** | **३००.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४ व दि.२५.०७.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी / कारणांमुळे एखाद्या योजनेखाली अनुदान अखर्चित राहील्यास, सदर अनुदान पुढील महिन्यामध्ये वितरीत करण्यात येणा-या अनुदानामध्ये समायोजित करावे.

३) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम, १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम,१९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यांसाठीच विहीत अनुदान देय राहील.

५) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

६) कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच, विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मूल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

७) शासनाने विद्यापीठाच्या काही नवीन योजनांना मान्यता देताना, सदर योजनेमधील पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करण्यास/भरण्यास मान्यता दिलेली आहे. यामुळे सदर नवीन योजनेसाठी नवीन पदे निर्माण झाल्यामुळे, ज्या योजनेतर / योजनांतर्गत मूळ योजनांमधील पदे अंतर्गत समायोजनाने नवीन योजनेकरिता वर्ग / उपलब्ध केली असतील, त्या मूळ योजनांमधील पदांचे वेतन व भत्यासाठी या आदेशान्वये वितरीत केलेला निधी खर्च करु नये. तसेच,तिमाही अनुदानाची मागणी करताना, अशा पदांचे वेतन व भत्त्यासाठी लागणा-या निधीची मागणी करु नये.

८) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम,१९९० आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता,१९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

९) सन २०२४-२५ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

१०) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

३. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

४. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर,१९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि-२००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. याप्रित्यर्थचा खर्च सन २०२४-२५ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार,तसेच,वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४ व दि.२५.०७.२०२४ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०८२३१४५८४५९८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Agricuture and Adf Deparment, 2.5.4.20=4367a98b1913c401683f04d0604dddbf6104bd9b26a678a0c12daf8bc922cfea, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60ae0791d92611a135ce51a5ee439203fdbdb395146d132620b3437eded658ce, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2024.08.23 15:13:57 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
२. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी
३. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
४. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला/ उपकोषागार अधिकारी, राहुरी, जिल्हा अहमदनगर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
८. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११.अवर सचिव/कक्ष अधिकारी,कार्यासन ६अे /२अे,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.